आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान या योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत. (लेखाशिर्ष २८०१ ५०८९)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र. ९/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २८ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.९/कार्यासन-६, दि.११.०९.२०२४.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४-प्र.क्र.९२/ऊर्जा-५, दि.१४.१०.२०२४.
५) उद्योग, उर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र.पूरमा-२०२४/प्र.क्र.८८/उर्जा-५ (ई-ऑफिस क्र. ८५९०४८).

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ऊर्जा विभागामार्फत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.५ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावावर वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २८०१, वीज या मुख्य लेखाशीर्षाखाली अनुसूचित जमाती घटकाकरीता महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.कोटीत)**

| योजनेचे नाव | लेखा शिर्ष | बाब | सन २०२४-२५ साठी मंजूर सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | जिल्हा | कामाचे नाव | वितरीत निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ५ | ६ | ७ |
| महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान | २८०१ ५०८९ | ३५, भांडवली मत्तेच्या निर्मिती करीता अनुदान | ७२.०० | ४१.४० | अहमदनगर | अकोले व संगमनेर येथील वाड्यावस्त्यांचे विद्युतीकरण. | ६.३४९८ |
| | | | | | नाशिक | कळवण तालुक्यातील विद्युत कामे | ५.३६०५ |
| | | | | | नाशिक | दिंडोरी पेठ येथील विद्युत कामे | ९.७७६५ |
| | | | | | नंदूरबार | गमन ता.अक्कलकुवा येथे ३३/११ के.व्ही.उपकेंद्र | ६.७०३२ |
| | | | | | धुळे | साक्री येथे बल्हाणे ते मानवकेंद्र येथे नवीन लिंक वाहिनी | २.४१ |
| **एकूण** | | | **७२.००** | **४१.४०** | | | **३०.६०** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.३०.६० कोटी (अक्षरी रुपये तीस कोटी साठ लाख फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा ई-ऑफिस नस्ती क्र.८५९०४८ वर पृ. ६३-६८/टि.वि., दि.१९.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२८१२४५०१७३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2025.03.28 13:59:33 +05'30'

**( किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.